**कृषी उन्नती योजनेअंतर्गत राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियानतंर्गत सन २०१५-१६ या वर्षातील अखर्चित निधीचा कार्यक्रम सन २०१६-१७ मध्ये राबविण्यासाठी पुनर्जिवित करणे व त्यासाठी आवश्यक निधी वितरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रागते-१२१६/ प्र.क्र.३१२/४अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: १४ फेब्रुवारी, २०१७.

वाचा :-

१) केंद्र शासनाने अभियाना संदर्भात http://agricoop.nic.in/dacdiviion/NMOOP2014.pdf या संकेतस्थळावर उपलब्ध करून दिलेल्या मार्गदर्शक सूचना.
२) शासन निर्णय क्रमांकः रागते-१२१६/प्र.क्र. १३२/४अे, दि. २६ मे,२०१६
३) कृषी सहकार व शेतकरी कल्याण विभाग, भारत सरकार यांचे पत्र क्र. १४-२/२०१६-CA. II, दिनांक १५ जुलै,२०१६
४) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृ.आ/वि.प्र.२/NMOOP १६-१७/वि.मा.प्रस्ताव/२१६/१६, दि. २५ जुलै, २०१६.
५) शासन निर्णय क्रमांकः रागते-१२१६/प्र.क्र. १३२/४अे, दि. ३० जुलै,२०१६

प्रस्तावना

केंद्र पुरस्कृत एकात्मिक गळीत धान्य,कडधान्य, तेलताड व मका विकास कार्यक्रम राज्यात सन २०१३-१४ पर्यंत राबविण्यात येत होता. केंद्र शासनाने बाराव्या पंचवार्षिक योजनेमध्ये सर्व केंद्र पुरस्कृत योजनांची पुनर्रचना केली आहे. त्यानुसार सन २०१४-१५ पासून केंद्र पुरस्कृत एकात्मिक गळीतधान्य, कडधान्य, तेलताड व मका विकास (ISOPOM ) कार्यक्रमाऐवजी राष्ट्रीय तेलबिया व तेलताड [National Mission on Oilseed and Oil Palm (NMOOP)] या अभियानाची सुरुवात केली आहे. सदर अभियानाअंतर्गत लघुअभियान- १ (तेलबिया), लघुअभियान-२ (तेलताड) व लघुअभियान-३ (वृक्षआधारित तेलबिया) या तीन लघुअभियानांचा समावेश आहे.

या अभियानाच्या निधीत, सन २०१४-१५ या वर्षात केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण ७५:२५ असे होते. सन २०१५-१६ पासून केंद्र शासनाने केंद्र व राज्य हिश्श्याच्या प्रमाणात ६०: ४० अशी सुधारणा केली आहे. राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियानासाठी केंद्र शासनाने सन २०१५-१६ या वर्षात केंद्र हिश्श्यापोटी रु.१९८२.८६ लक्ष एवढा निधी उपलब्ध करुन दिला. सन २०१४-१५ या वर्षातील रु.१४.७१लक्ष एवढा निधी अखर्चित होता. अशाप्रकारे सन २०१५-१६ या वर्षात केंद्र हिश्श्याचा रु.१९९७.५७ लक्ष एवढा निधी उपलब्ध होता. सदर निधीपैकी रु.१७७१.७१ लक्ष एवढा निधी खर्च झाला व रु.२२५.८६ लक्ष एवढा निधी अखर्चित राहिला. केंद्र शासनाने संदभाधीन अ.क्र.३ येथील दि. १५ जुलै, २०१६ च्या पत्रान्वये सदर निधी सन २०१६-१७ या वर्षात खर्च करण्यासाठी पुनर्जिवित करुन दिलेला आहे.

केंद्र हिश्श्याचा सन २०१५-१६ या वर्षातील अखर्चित निधी रु.२२५.८६ लक्ष व त्याप्रमाणात आवश्यक राज्य हिस्सा रु.१५०.५७ लक्ष अशा एकूण रु.३७६.४३ लक्ष निधीचा कार्यक्रम सन २०१६-१७ या वर्षामध्ये राबविण्यासाठी प्रशासकीय मान्यता व सर्वसाधारण व अनुसूचित जाती प्रवर्गासाठी केंद्र हिस्सा रु.१३०.२२ लक्ष व अनुसूचित जाती प्रवर्गासाठी राज्य हिस्सा रु.५१.८५ लक्ष अशा एकुण रु.१८२.०७लक्ष रकमेच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

केंद्र पुरस्कृत कृषी उन्नती योजनेअंतर्गत- राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियानाचा ( National Mission on Oil seeds and Oil Palm) सन २०१५-१६ या वर्षातील अखर्चित कार्यक्रम, केंद्र हिस्सा रु.२२५.८६ लक्ष व त्याप्रमाणात राज्य हिस्सा रु.१५०.५७ लक्ष असा एकूण रु.३७६.४३ लक्ष एवढया रकमेचा पुनर्जिवित कार्यक्रम सन २०१६-१७ या वर्षात राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधीचे लघुअभियाननिहाय, प्रवर्गनिहाय वाटप पुढीलप्रमाणे राहिल.

**(रु. लक्ष)**

| प्रवर्ग | लघु अभियान क्र. १ (तेलबीया) | | | लघु अभियान क्र. ३ (वृक्ष आधारीत तेलबिया) | | | एकुण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण (अ) | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण (ब) | (अ+ब) |
| सर्वसाधारण | ३९.५६ | २६.३७ | ६५.९३ | १२.८८ | ८.५९ | २१.४७ | ८७.४० |
| अनुसूचित जाती | ७४.४२ | ४९.६१ | १२४.०३ | ३.३६ | २.२४ | ५.६० | १२९.६३ |
| अनुसूचित जमाती | ९५.६४ | ६३.७६ | १५९.४० | - | - | - | १५९.४० |
| **एकुण** | **२०९.६२** | **१३९.७४** | **३४९.३६** | **१६.२४** | **१०८३** | **-** | **३७६.४३** |

३) सदर कार्यक्रम सर्वसाधारण व अनुसूचित जाती प्रवर्गासाठी राबविण्यासाठी केंद्र हिस्सा रु.१३०.२२ लक्ष व अनुसूचित जाती प्रवर्गासाठी राज्य हिस्सा रु.५१.८५लक्ष अशा एकूण १८२.०७ लक्ष रकमेच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

४) सदर निधीच्या प्रवर्गनिहाय व उप-अभियान निहाय तपशील खालील प्रमाणे राहिल:

**(रु. लक्ष)**

| प्रवर्ग | लघु अभियान क्र. १ (तेलबीया) | | | लघु अभियान क्र. ३ (वृक्ष आधारीत तेलबिया) | | | एकुण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण (अ) | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण (ब) | (अ+ब) |
| सर्वसाधारण | ३९.५६ | - | ३९.५६ | १२.८८ | - | १२.८८ | ५२.४४ |
| अनुसूचित जाती | ७४.४२ | ४९.६१ | १२४.०३ | ३.३६ | २.२४ | ५.६० | १२९.६३ |
| **एकुण** | **११३.९८** | **४९.६१** | **१६३.५९** | **१६.२४** | **२.२४** | **१८.४८** | **१८२.०७** |

५. सदर खर्च खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०१६-१७ या वर्षाच्या मंजूर तरतुदीतुन भागविण्यात यावा.

**मागणी क्र.डी-३**

२४०१, पीक संवर्धन तेलबिया

(००)(०६) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान लघु अभियान - एक (तेलबिया) (कें.पु.यो.) (केंद्र हिस्सा ६०%) (सर्वसाधारण)

(२४०१२४९८)

३३, अर्थसहाय

**मागणी क्र.डी-३**

२४०१, पीक संवर्धन

११४,तेलबिया

(००)(१३) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय अभियान - तेलबिया व तेलताड लघु अभियान - तीन (वृक्ष आधारीत तेलबिया) (डी.एस.ए.ओ) (कें.पु.यो.) (केंद्र हिस्सा ६०%) (सर्वसाधारण) (२४०१ ९४९२)

३३, अर्थसहाय

**मागणी क्र. डी-३**

२४०१- पीकसंवर्धन,

(००) (७८९) अनुसूचित जाती उपयोजना-

(००) (१७) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान, लघु अभियान- १ (तेलबिया) (केंद्र पुरस्कृत योजना) (केंद्र हिस्सा ६०%) (अनुसूचित जाती उपयोजना)

(२४०१ ए३४१) (योजनांतर्गत) (दत्तमत)

३३- अर्थसहाय्य.

**मागणी क्र. डी-३**

२४०१- पीकसंवर्धन,

(००) (७८९) अनुसूचित जाती उपयोजना-

(००) (१८) कृषि उन्न्ती योजना- राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान, लघु अभियान- १ (तेलबिया) (केंद्र पुरस्कृत योजना) (राज्य हिस्सा ४०%) (अनुसूचित जाती उपयोजना)

(२४०१ ए३५२) (योजनांतर्गत) (दत्तमत)

३३- अर्थसहाय्य.

**मागणी क्र. डी-३**

२४०१- पीकसंवर्धन,

(००) (७८९) अनुसूचित जाती उपयोजना-

(००) (२१) कृषि उन्न्ती योजना- राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान, लघु अभियान- ३ (वृक्षधारित तेलबिया) (केंद्र पुरस्कृत योजना) (केंद्र हिस्सा ६०%) (अनुसूचित जाती उपयोजना)

(२४०१ए३८८) (योजनांतर्गत) (दत्तमत)

३३- अर्थसहाय्य.

**मागणी क्र. डी-३**

(००) (७८९) अनुसूचित जाती उपयोजना

(००) (२२) कृषि उन्न्ती योजना- राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान, लघु अभियान- ३ (वृक्षधारति तेलबिया) (केंद्र पुरस्कृत योजना) (राज्य हिस्सा ४०%) (अनुसूचित जाती उपयोजना) (२४०१ए३९७) (योजनांतर्गत) (दत्तमत)

३३- अर्थसहाय्य.

३. सर्वसाधारण प्रवर्गासाठी राज्य हिश्श्याच्या जिल्हा नियोजन समितीच्या अखत्यारीतील तरतूदीस प्रशासकीय तसेच वित्तीय मान्यता संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडून देण्यात येईल.

४. सदर निधी खर्च करताना संदर्भाधीन अ.क्र.१ येथील नमूद केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना तसेच संदर्भाधीन अ.क्र.२ येथील दि. २६ मे, २०१६ व संदर्भाधीन अ.क्र. ५ येथील दि. ३० जुलै, २०१६ च्या शासन निर्णयातील अटी, शर्ती व कार्यपद्धतीचे पालन करण्यात यावे.

५. सदर निधी सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात खर्च होईल, याची दक्षता घ्यावी.

६. अनुसूचित जाती प्रवर्गासाठी उपलब्ध करुन दिलेला निधी अनुसूचित जाती व नवबौद्ध घटकांच्या लाभार्थ्यांकरीता खर्च होईल, याची दक्षता घ्यावी.

७. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौ. संदर्भ क्र. १९९/२०१६/व्यय-१, दि. २० डिसेंबर,२०१६ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२१४१७१६३६१५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2017.02.14 17:27:31 +05'30'

**(सु. सं. धपाटे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
२. सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे-१
३. विभागीय आयुक्त (सर्व)
४. जिल्हाधिकारी, (सर्व)
५. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
७. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)

८. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
९. कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१०.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
११.मुख्या लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
१२.व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित, आरे, दुग्ध कॉलनी गोरेगाव (पूर्व), मुंबई-६५
१३.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, शास्त्रीनगर, अकोला.
१४.सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई / नागपूर
१६.महालेखाकार( स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा), प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०
१७.नियोजन विभाग (कार्यासन - १४३१ / कार्यासन - १४४४), मंत्रालय, मुंबई - ३२
१८. वित्त विभाग (व्यय-१) /अर्थसंकल्प -१३
१९.सामाजिक न्याय, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग / आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२०.ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
२१.सर्व सहसचिव /उपसचिव / अवर सचिव/ कक्ष अधिकारी (फक्त कृषी ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२२.मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
२३.मा. राज्यमंत्री (कृषि ) यांचे खाजगी सचिव
२४.निवडनस्ती (कार्यासन-४अे, कृषी व पदुम विभाग )